“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत पर्यटन विभागास विविध उपक्रम/ प्रकल्पांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४ /प्र.क्र.१०७/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र.संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दिनांक १२ मार्च, २०२४
२) पर्यटन विभाग शासन निर्णय क्र. टिडीएस-२०२३/०६/ प्र.क्र.२८८/पर्यटन-४, दिनांक १४ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ११ मार्च, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” निमित्त पर्यटन विभागास विविध उपक्रम/ प्रकल्पांना निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

उपर्निर्दिष्ट क्र. २ अन्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने पर्यटन विभागास विविध उपक्रम / प्रकल्पांकरीता येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत पर्यटन विभागास खालील उपक्रम/प्रकल्पांकरीता रुपये १४.५६ कोटी (अक्षरी रुपये चौदा कोटी छप्पन्न लक्ष फक्त) इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम (कोटी) |
|---|---|---|
| १ | सामानगड, जि.कोल्हापूर येथे पायाभूत सुविधा उभारणे | १.५६ कोटी |
| २ | भातसा धरण, ता.शहापूर येथे काचेचा पूल, व्हिवींग गॅलरी, सेल्फी पॉइंट इत्यादी सुविधा निर्माण करणे | ३.०० कोटी |
| ३ | मौजे अंबरले, ता.माणगाव, जि.रायगड येथे पायाभूत सुविधा निर्माण करणे | २.०० कोटी |
| ४ | जुना जव्हार राजवाडा, ता.जव्हार, जि.पालघर येथील जय विलास पॅलेस राजवाड्याचे दुरुस्ती व जतन करणे | ३.०० कोटी |
| ५ | होनाई देवी परिसर, हातनूर, ता. तासगांव, जि.सांगली येथे वाहनतळ, सुलभ शौचालय, सोलर पथदिवे बसविणे | ३.०० कोटी |

| | | |
|---|---|---|
| ६ | ओझरखेड धरणक्षेत्र, ता.दिंडोरी, जि.नाशिक येथे पार्किंग, शौचालय, पिण्याच्या पाण्याची व्यवस्था इत्यादी मूलभूत सुविधा निर्माण करणे | २.०० कोटी |
| | **एकूण खर्च रुपये** | **१४.५६ कोटी** |

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती , (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर तरतूद ही सहायक अनुदान स्वरुपाची असल्याने सदर देयक MTR 44 या देयक नमुन्यात सादर करावे.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती अहवाल संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५०-२०२४/व्यय १५, दि. २० मार्च, २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३३११७१७४१४९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.31 17:37:28 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव ( सां.का. ४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक

कार्य विभाग, मंत्रालय

५. उप सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवडनस्ती, सां.का.४.